**महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्थेअंतर्गत मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी ई-निविदा प्रणाली अंतर्गत अल्प कालावधीची निविदा सूचना प्रसिध्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. निविदा-२०१९/प्र.क्र.११/ बांधकाम-४**
बांधकाम भवन २५ ,मर्झबान पथ,
फोर्ट मुंबई ४०० ००१
दिनांक: १८ जानेवारी, २०१९

**वाचा:-**

**१) शासन निर्णय ग्रा.वि.वि. निविदा-२०१६/प्र.क्र.१९५/पंरा-७,दि.२६ जुलै,२०१६**

**प्रस्तावना :-**

ग्रामविकास विभागांतर्गत रस्ते वाहतुक सुरक्षित व सुरळीत होण्यासाठी रस्त्यांची कामे तातडीने कार्यान्वीत होणे गरजेचे आहे. यासाठी रस्त्यांच्या विविध प्रकारच्या कामांसंदर्भात ई-निविदा प्रणाली अंतर्गत निविदा सूचनेचा कालावधी संदर्भीय दि. २६ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आला आहे .

२. महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था अंतर्गत मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेची रस्त्यांची व पुलांची कामे तातडीने व वेळेवर पूर्ण होणे आवश्यक असल्याने त्या अनुषंगाने, सदरील कामांची जाहीर निविदा सूचना काढणे, निविदा प्रक्रिया पुर्ण करणे व प्रत्यक्ष कार्यारंभ आदेश देऊन काम सुरु करणे ही सर्व प्रक्रिया त्वरेने पूर्ण करण्याच्या दृष्टीने अल्प कालावधीची निविदा सूचना प्रसिध्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था अंतर्गत मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेची रस्त्यांची व पुलांची कामे तातडीने व वेळेवर पुर्ण होणे आवश्यक असल्याने त्या अनुषंगाने, मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेची रस्त्यांच्या व पुलांच्या कामाची जाहीर निविदा सूचना काढणे, निविदा प्रक्रिया पुर्ण करणे व प्रत्यक्ष कार्यारंभ आदेश देऊन काम सुरु करणे ही सर्व प्रक्रिया त्वरेने पूर्ण करण्याच्या दृष्टीने संदर्भीय दिनांक २६ जुलै, २०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद १ मध्ये सदर निविदा बोलविण्यासाठी निर्धारीत केलेला कालावधी आता पुढील प्रमाणे ठेवण्यास एक विशेष बाब म्हणून शासन मंजुरी देत आहे.

| अ.क्र. | कामाच्या निविदेची किंमत | निविदा सूचना क्रमांक व कालावधी | | |
|---|---|---|---|---|
| | | प्रथम | द्वितीय | तृतीय |
| १ | रुपये ५.०० लाखपेक्षा अधिक किंमतीची रस्त्याची कामे | १० दिवस | ८ दिवस | ८ दिवस |

**२. वरील आदेश दिनांक १ एप्रिल, २०१९ पासून आपोआप रद्द होवून ,संदर्भीय शासन निर्णय दिनांक २६ जुलै, २०१६ मधील या संदर्भातील तरतुदी पुन:श्च लागु होतील.**

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०११७१७४६२६१६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dilip Babasaheb Patil

Digitally signed by Dilip Babasaheb Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e461e0a32ec649f0a60e4372f7cbbb3edff433d33cc0d95db6f8dbf1fa4f7f, cn=Dilip Babasaheb Patil
Date: 2019.01.18 17:25:26 +05'30'

(दि.बा.पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.मंत्री (ग्रामविकास विभाग) यांचे खाजगी सचिव,
४. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास विभाग) यांचे खाजगी सचिव,
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद यांचे स्वीय सहायक,
६. प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग यांचे स्वीय सहायक,
७. सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्रामविकास विभाग यांचे स्वीय सहायक,
८. विभागीय आयुक्त यांचे स्वीय सहायक (सर्व)
९. मुख्य अभियंता प्रधानमंत्री ग्रामसडक योजना, पुणे
१०. वित्तीय नियंत्रक, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था
११. उप सचिव (प्र.मं.ग्रा.स.यो/ मु.मं.ग्रा.स.यो.) यांचे स्वीय सहायक
१२. सर्व अधिक्षक अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो.
१३. सर्व कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो./मु.मं.ग्रा.स.यो.)
१४. निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४